**केंद्र शासनाने मंजूर केलेली एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पुनर्संरचना या नवीन योजनेकरिता विभागांतर्गत कार्यरत असलेल्या पदांमधून तसेच मानधन तत्त्वावर पदे निर्माण करुन भरण्यास मान्यता देणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
### महिला व बाल विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१२/प्र.क्र.४३६(भाग-२)/का.६

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २२ ऑक्टोंबर, २०१४

**वाचा :-**

१) केंद्र शासन, महिला व बाल विकास विभाग, No.१-८/२०१२/CD-I, दिनांक २२.१०.२०१२ चे पत्र
२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१२/प्र.क्र.४३६/का.६, दिनांक ३०.०४.२०१४
३) उच्चस्तरीय सचिव समितीचे क्र.पदनि-२०१४/प्र.क्र.३३/१४/वि.सु.१, दिनांक ३१.०७.२०१४ च्या पत्रान्वये प्राप्त झालेले कार्यवृत्त

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने मंजूर केलेली एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पुनर्संरचना ही नवीन योजना महाराष्ट्र राज्याकरीता लागू करण्याकरीता वाचा येथील अ.क्र.२ अन्वये शासनाने मान्यता दिलेली आहे. सदर योजना खालील २० जिल्हयातील मंजूर असणा-या एकूण ३१७ प्रकल्पातील ६०,१३२ अंगणवाडी केंद्रांना लागू करण्यात येणार आहे.

| अ. क्र. | जिल्हयाचे नांव | अ.क्र. | जिल्हयाचे नाव |
|---|---|---|---|
| १ | वर्धा | ११ | धुळे |
| २ | नंदुरबार | १२ | बीड |
| ३ | बुलढाणा | १३ | अमरावती |
| ४ | नांदेड | १४ | जालना |
| ५ | गडचिरोली | १५ | नागपूर |
| ६ | चंद्रपूर | १६ | सांगली |
| ७ | जळगांव | १७ | मुंबई |
| ८ | वाशिम | १८ | हिंगोली |
| ९ | अहमदनगर | १९ | नाशिक |
| १० | परभणी | २० | गोंदिया |

या नवीन योजनेच्या अंमलबजावणीचे प्रभावी नियोजन, व्यवस्थापन, पर्यवेक्षण व संनियंत्रण होण्यास सहाय्य होण्याच्या हेतूने राज्य एकात्मिक बाल विकास सेवा योजना अभियान संचालनालय तथा राज्य बाल विकास संस्था असे व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यास व त्याअंतर्गत आवश्यक कर्मचारी वृंदाची पदे (१० पदे ही विभागांतर्गत कार्यरत असलेल्या पदांमधून व उर्वरित २६ पदे मानधन तत्त्वावर) निर्माण करण्यास तसेच जिल्हा स्तरावर व गट / प्रकल्प स्तरावरदेखील जिल्हा व गट / प्रकल्प एकात्मिक बाल विकास सेवा योजना अभियान संचालनालयाअंतर्गत व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यास व त्याअनुषंगाने जिल्हयाअंतर्गत आवश्यक कर्मचारी वृंदाची पदे (१२० पदे ही विभागांतर्गत कार्यरत असलेल्या पदांमधून व उर्वरीत १२० पदे मानधन तत्त्वावर) तसेच गट / प्रकल्पांतर्गत आवश्यक कर्मचारी वृंदाची पदे (३४६७ पदे ही विभागांतर्गत कार्यरत असलेल्या पदांमधून व उर्वरीत ९५१ पदे मानधन तत्त्वावर) निर्माण करुन भरण्यास तसेच केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार ५४,९५३ अतिरिक्त अंगणवाडी सेविका-नि-पोषणाहार समुपदेशक व ३००० अतिरिक्त पाळणाघर सेविका पदांची निर्मिती मानधन तत्त्वावर करुन सदर पदावर महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१२/प्र.क्र.४२९/का.६, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४ नुसार संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी यांचेकडून नेमणुका करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पुनर्संरचना या नवीन योजनेच्या अंमलबजावणीचे प्रभावी नियोजन, व्यवस्थापन, पर्यवेक्षण व संनियंत्रण होण्यास सहाय्य होण्याच्या हेतूने, राज्य एकात्मिक बाल विकास सेवा योजना अभियान संचालनालय तथा राज्य बाल विकास संस्था असे व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यास व त्याअंतर्गत “विवरणपत्र-अ” प्रमाणे आवश्यक कर्मचारी वृंदाची पदे (१० पदे ही विभागांतर्गत कार्यरत असलेल्या पदांमधून व उर्वरीत २६ पदे मानधन तत्त्वावर) निर्माण करुन भरण्यास तसेच जिल्हा स्तरावर व गट / प्रकल्प स्तरावरदेखील जिल्हा व गट / प्रकल्प एकात्मिक बाल विकास सेवा योजना अभियान संचालनालया अंतर्गत व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यास व त्याअनुषंगाने जिल्हयाअंतर्गत आवश्यक कर्मचारी वृंदाची पदे (१२० पदे ही विभागांतर्गत कार्यरत असलेल्या पदांमधून व उर्वरीत १२० पदे मानधन तत्त्वावर) निर्माण करुन भरण्यास तसेच गट / प्रकल्पांतर्गत आवश्यक कर्मचारी वृंदाची पदे (३४६७ पदे ही विभागांतर्गत कार्यरत असलेल्या पदांमधून व उर्वरीत ९५१ पदे मानधन तत्त्वावर) निर्माण करुन भरण्यास तसेच केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार ५४,९५३ अतिरिक्त अंगणवाडी सेविका-नि-पोषणाहार समुपदेशक व ३००० अतिरिक्त पाळणाघर सेविका पदांची निर्मिती मानधन तत्त्वावर करुन सदर पदावर महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१२/प्र.क्र.४२९/का.६, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४ नुसार संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी यांचेकडून भरण्यास / नेमणुका करण्यास केंद्र शासनाकडून निधी प्राप्त होईपर्यंतच्या कालावधीसाठी तसेच मानधन

तत्त्वावरील पदासाठी खालील अटींच्या अधिन राहून उच्चस्तरीय सचिव समितीने दिनांक २४.०६.२०१४ च्या बैठकीत मान्यता दिल्यानुसार शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) सदरच्या नियुक्त्या मानधन तत्त्वावर करण्यात येणार आहेत.
२) सदरची सेवाभरती जाहिरातीद्वारे / सेवायोजना कार्यालय यांच्यामार्फत करण्यात यावी.
३) सदर पदे केंद्र शासनाच्या योजनेच्या अनुषंगाने निर्माण करण्यात येणार आहेत त्यामुळे सदर योजना बंद करण्यात आल्यास संबंधितांच्या सेवा आपोआप संपुष्टात येतील.
४) कालांतराने असे नियुक्त केलेले कर्मचारी त्यांची संधी गेली, वय झाले, इतकी वर्ष सेवा केली आता कोणतेही जगण्याचे साधन नाही. भरती विहित मार्गाने जाहिरात देऊन झाली या कारणास्तव नियमित करण्याची मागणी केली जाईल तथापि सदरची पदे ही मानधन तत्त्वावरील आहेत त्यामुळे त्यांना सेवेत सामावून घेण्याचा हक्क प्राप्त होणार नाही.
५) योजनेचे स्वरुप बदलणे वा मानधन जास्त झाले या कारणामुळे आता सेवेत सामावून घेण्याची मागणी करता येणार नाही.
६) भरती करावयाच्या पदासाठी शैक्षणिक अर्हता, कमाल व किमान वयोमर्यादा इत्यादी बाबींचाही जाहिरातीमध्ये उल्लेख करण्यात यावा.
७) सुरुवातीला ३ वर्षासाठी नेमणूक करुन परत मुल्यमापनाअंती फेरनेमणुक करण्यात यावी. तसेच या केलेल्या सेवेमुळे अन्य कोणत्याही पदावर नियुक्ती मिळण्याचा हक्क प्राप्त होणार नाही हे नियुक्ती आदेशामध्ये स्पष्ट नमूद करण्यात यावे.
८) सदर योजनेअंतर्गत पदे भरतांना राजमाता जिजाऊ माता व बाल आरोग्य पोषण मिशन अंतर्गत असणारी सर्व पदे राज्यातील लोकांना सर्वात जास्त फायदा होईल अशाप्रकारे सामावून घेण्यात यावीत.

वरील १ ते ७ अटींचा समावेश पदभरतीच्या जाहिरातीमध्ये व उमेदवारांच्या नियुक्ती आदेशात करण्यात यावा. सदर पदांना प्रतिमाह द्यावयाची ठोक रक्कमेची तरतूद अर्थसंकल्पित झाल्यानंतर सदर पदांची भरती / नेमणुका करण्यात याव्यात. या योजनेस आवश्यक असणारे राज्य अभियान संचालक या पदावर वरिष्ठ सचिव दर्जाचे अधिकारी नियुक्ती करण्यासाठी महिला व बाल विकास विभागामार्फत सामान्य प्रशासन विभागाकडे विनंती करण्यात यावी. राज्य अभियान संचालक यांचे कार्यालय रायगड भवन, नवी मुंबई येथे सुरु करण्यात यावे. तर राज्य अभियान संचालक यांच्या कार्यालयात तसेच जिल्हास्तरावर व प्रकल्पस्तरावर या योजनेस आवश्यक असणारी विभागांतर्गत कार्यरत पदे उपलब्ध करुन देण्याबाबतची कार्यवाही आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी. राज्य अभियान संचालक यांनी त्यांच्या कार्यालयात तसेच त्यांच्या अखत्यारीतील जिल्हास्तरावर व प्रकल्पस्तरावर आवश्यक असणारी मानधन तत्त्वावरील पदे केंद्र शासनाच्या निर्देशानुसार भरण्याबाबत

आवश्यकती कार्यवाही करावी. तर अतिरिक्त अंगणवाडी सेविका-नि-पोषणाहार समुपदेशक व ३००० अतिरिक्त पाळणाघर सेविका पदांची भरतीप्रक्रिया महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१२/प्र.क्र.४२९/का.६, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४ नुसार संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी यांनी करावी. राज्य अभियान संचालनालया अंतर्गत येणारी सर्व कार्यरत पदांची व मानधन तत्त्वावरील पध्दतीने निर्माण केलेल्या पदांची जबाबदा-या, कर्तव्य व अधिकार याबाबत केंद्र शासन वेळोवेळी निर्देश देईल त्यानुसार लागू राहतील. केंद्र शासनाच्या निर्देशानुसार या पदांच्या जबाबदा-या, कर्तव्य व अधिकार काय असतील याबाबतचे स्वतंत्र आदेश राज्य अभियान संचालक यांचेमार्फत वेळोवेळी काढण्यात यावेत.

याप्रकरणी येणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक एक्स-१
२२३६ पोषण आहार
०२ पोषक अन्न व पेय वितरण
१०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम
०४ केंद्र पुरस्कृत योजना
(०४) (१५) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पुनर्संरचना योजना
(ग्रामीण) केंद्र हिस्सा ७५%
०२ मजुरी
३१ सहाय्यक अनुदान **(२२३६ १६३१)**

मागणी क्रमांक एक्स-१
२२३६ पोषण आहार
०२ पोषक अन्न व पेय वितरण
१०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम
०४ केंद्र पुरस्कृत योजना
(०४) (१६) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पुनर्संरचना योजना
(ग्रामीण) राज्य हिस्सा २५%
०२ मजुरी
३१ सहाय्यक अनुदान **(२२३६ १६४२)**

मागणी क्रमांक एक्स-१
२२३६ पोषण आहार
०२ पोषक अन्न व पेय वितरण
१०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम
०४ केंद्र पुरस्कृत योजना

(०४) (१७) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पुनर्संरचना योजना
(नागरी) केंद्र हिस्सा ७५%
०२ मजुरी
३१ सहाय्यक अनुदान **(२२३६ १६५१)**

मागणी क्रमांक एक्स-१
२२३६ पोषण आहार
०२ पोषक अन्न व पेय वितरण
१०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम
०४ केंद्र पुरस्कृत योजना
(०४) (१८) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पुनर्संरचना योजना
(नागरी) राज्य हिस्सा २५%
०२ मजुरी
३१ सहाय्यक अनुदान **(२२३६ १६६९)**

सदर शासन निर्णय हा सामान्य प्रशासन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१६३४/कार्या-१२, दिनांक १६.०९.२०१४ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.६३०/व्यय-६, दिनांक १०.१०.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीने व त्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२१११४५१०३१३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uke Ujjwal

Digitally signed by Uke Ujjwal
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICE, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uke Ujjwal
Date: 2014.10.27 14:42:08 +05'30'

**(उज्ज्वल ऊके)**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५. प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सर्व मंत्रालयीन विभाग
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
८. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रियर विंग, १ ला मजला, रायगड भवन, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई
९. राज्य अभियान संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पुनर्संरचना, रियर विंग, १ ला मजला, रायगड भवन, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई
१०.आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
११.महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद
१२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१३. सर्व विभागीय आयुक्त
१४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधान भवन, मुंबई
१५. सर्व जिल्हाधिकारी
१६.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१७.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
१८. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी
१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२१. सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद
२२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२४. महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
२५. निवड नस्ती (कार्यासन ६)

**(महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१२/प्र.क्र.४३६ (भाग-२)/का.६, दिनांक २२ ऑक्टोंबर, २०१४ सोबतचे विवरणपत्र-अ)**

**(कंत्राटी पदांबाबत केंद्राचा हिस्सा ७५% व राज्याचा हिस्सा २५% तर कार्यरत पदाबाबत केंद्राचा हिस्सा ९०% व राज्याचा हिस्सा १०% तथापि राज्य अभियान संचालक या पदाबाबत केंद्राचा हिस्सा ७५% व राज्याचा हिस्सा २५%)**

**(१) राज्य अभियान संचालक अंतर्गत व्यवस्थापन कक्षातील पदे**

| अ. क्र. | पदनाम | प्रकार | पदांची संख्या | १ पदास द्यावयाची वेतनश्रेणी / प्रतिमाह ठोक रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | राज्य अभियान संचालक | कार्यरत पदामधून | ०१ | ६७०००/- ते ७९०००/- |
| २ | सह अभियान संचालक | कार्यरत पदामधून | ०१ | ----- |
| ३ | उप अभियान संचालक | कार्यरत पदामधून | ०१ | ----- |
| ४ | कार्यक्रम व्यवस्थापक | मानधन तत्त्वावर | ०४ | ८०,०००/- |
| ५ | वरिष्ठ सल्लागार | मानधन तत्त्वावर | १० | ७०,०००/- |
| ६ | सल्लागार | मानधन तत्त्वावर | १० | ५०,०००/- |
| ७ | कार्यक्रम अधिकारी | कार्यरत पदामधून | ०१ | ----- |
| ८ | लेखापाल | कार्यरत पदामधून | ०१ | ----- |
| ९ | उच्चस्तरीय लिपिक | कार्यरत पदामधून | ०१ | ----- |
| १० | लघुलेखक | कार्यरत पदामधून | ०१ | ----- |
| ११ | निम्नस्तर लिपिक | कार्यरत पदामधून | ०१ | ----- |
| १२ | सांख्यिकी सहाय्यक | कार्यरत पदामधून | ०१ | ----- |
| १३ | माहिती तथा नोंदणीकार तथा डाटा एन्ट्री | मानधन तत्त्वावर | ०२ | १५,१९२/- |
| १४ | शिपाई | कार्यरत पदामधून | ०१ | ----- |
| | **एकूण** | | **३६** | |

**(२) जिल्हास्तरावरील अभियान संचालनालयांतर्गत व्यवस्थापन कक्षातील पदे**

| अ. क्र. | पदनाम | प्रकार | पदांची संख्या | १ पदास द्यावयाची प्रतिमाह ठोक रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | जिल्हा कार्यक्रम अधिकारी | कार्यरत पदामधून | २० | ६०,४१६/- |
| २ | कार्यालय अधिक्षक | कार्यरत पदामधून | २० | २८,०८८/- |
| ३ | जिल्हा समन्वयक | मानधन तत्त्वावर | १०० | १५,९७१/- |
| ४ | सांख्यिकी सहाय्यक (M&E) | कार्यरत पदामधून | २० | ----- |
| ५ | उच्चस्तरीय लिपिक | कार्यरत पदामधून | २० | ------ |
| ६ | निम्नस्तरीय लिपिक | कार्यरत पदामधून | २० | ----- |
| ७ | डाटा एन्ट्री ऑपरेटर | मानधन तत्त्वावर | २० | १५,१९२/- |
| ८ | शिपाई | कार्यरत पदामधून | २० | ----- |
| | **एकूण** | | **२४०** | |

## (३) प्रकल्पस्तरावरील अभियान संचालनालयांतर्गत व्यवस्थापन कक्षातील पदे

| अ. क्र. | पदनाम | प्रकार | पदांची संख्या | १ पदास द्यावयाची प्रतिमाह ठोक रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | बाल विकास प्रकल्प अधिकारी | कार्यरत पदामधून | ३१७ | ----- |
| २ | लिपिक टंकलेखक | कार्यरत पदामधून | ३१७ | ----- |
| ३ | सांख्यिकी सहाय्यक (M&E) | कार्यरत पदामधून | ३१७ | ----- |
| ४ | पर्यवेक्षक | कार्यरत पदामधून | २१९९ | ----- |
| ५ | आरोग्य सेवक | मानधन तत्त्वावर | ३१७ | २५,०००/- |
| ६ | समन्वय (ECCE) | मानधन तत्त्वावर | ३१७ | ३५,०००/- |
| ७ | पोषण आहार | मानधन तत्त्वावर | ३१७ | ३५,०००/- |
| ८ | शिपाई | कार्यरत पदामधून | ३१७ | ----- |
| ९ | अतिरिक्त अंगणवाडी सेविका-नि-पोषणाहार समुपदेशक | मानधन तत्त्वावर | ५४९५३ | ३,०००/- |
| १० | अतिरिक्त पाळणाघर सेविका | मानधन तत्त्वावर | ३००० | ३,०००/- |
| | **एकूण** | | **६२३७१** | |

*    *    *    *    *